ग्रामीण रुग्णालय, अक्कलकोट जि. सोलापूर येथील जमीन संपादित केल्याने मा. न्यायालयाचे आदेशानुसार नुकसान भरपाई अदा करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.३३३/आरोग्य ३अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत

मंत्रालय, मुंबई ४००००१

दिनांक : २० जानेवारी, २०२०

वाचा :-

१) शासन पूरकपत्र क्रमांक :- संकीर्ण २०१२/प्र.क्र. २५९/ आ ३अ दिनांक २९/१०/२०१३

२) उपजिल्हाधिकरी, भूसंपादन क्रं. ३, सोलापूर यांचे पत्र क्रमांक:- २०१९/उभुसं/३/कावि-३/आरआर-१२१/१९ दिनांक २१/११/२०१९ रोजी

३) सह संचालक आरोग्य सेवा (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांचे पत्र क्रमांक :- संआसे/कक्ष-३/टे-२/ग्रारु अक्कलकोट/जागेबाबत/१०४-६/२०२० दिनांक २/१/२०२०

प्रस्तावना :-

श्री. वसंतराव तुळशीराम खराडे व इतर यांची जमीन गट नं ७०६ क्षेत्र ५.०१ हेक्टर नगर परिषद, अक्कलकोट यांनी संपादित करुन सदरची जमीन जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर यांच्या नावे ग्रामीण रुगणालय, अक्कलकोट करीता हस्तांतरीत करण्यात आलेली आहे. श्री. वसंतराव तुळशीराम खराडे व इतर यांना सदर जागेच्या मोबदल्यापोटी मा. सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी दिलेल्या निर्णयानुसार नुकसान भरपाईची रक्कम रु. ५,००,९०,४३५/- इतकी रक्कम दिनांक २९.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये जमीन धारकास अदा करणेकामी शासनाने निर्णय घेतला होता. त्यानुसार कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांनी रक्कम

रु. ४,४९,३१,१२०/- (टीडीएस) वजा जाता धनादेश क्र. ५०४३६३ दि. २८/३/२०१४ अन्वये मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर सोलापूर येथे जमा करण्यात आलेली आहे. सदर धानादेशद्वारे दरखास्तदार यांना वरील रक्कम रु. ४,४९,३१,१२०/- दि. १५/४/२०१४ रोजी न्यायालयीन पावती क्र.०७३४०४२ दि. ३/४/२०१४ नुसार अदा करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने ग्रामीण रुग्णालय, अक्कलकोट साठी संपादीत केलेली जमीन जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर यांचे नावे लावणेची कार्यवाही पुर्ण झालेली आहे. श्री. खराडे यांनी मा. न्यायालयाकडे दरखास्त क्र. १३५/१९९६ मध्ये अर्ज देवून दिनांक ३१/३/२०१४ पर्यंत १५ टक्के व्याजाची आकारणी करुन रक्कम रु. ४९,९२,०९७/- एवढया रक्कमेची दरखास्त दाखल केली आहे. उपजिल्हाधिकारी, भूसंपादन क्र. ३, सोलापूर यांनी दिनांक १७/१२/२०१९ रोजीच्या पत्रान्वये, दिनांक ३१/१२/२०१९ पर्यंत देय रक्कम रुपये ४९,६१,०९१/- (एकूण ६९ महीने) देय रक्कमेवर दर साल १५ टक्के या प्रमाणे रुपये ४२,७८,९४०/- असे एकूण ९२,४०,०३१/- एवढ्या अनुदानाचे आजमितीस आवश्यक आसल्याचे व सदर प्रकरणी दरमहा रुपये ६२,०१३.६३/- इतका नाहक अतिरिक्त व्याजाचा अर्थिक बोजा शासनास द्यावा लागणार आहे, असे नमूद केले आहे. श्री. वसंतराव खराडे यांना द्यावयाची एकूण रक्कम उपजिल्हाधिकारी, भूसंपादन क्र. ३, सोलापूर यांनी परीगणाना केल्यानुसार दिनांक ३१.०१.२०२० अखेर पर्यंतची रु. ९३,०२,०४५/- इतकी रक्कम न्यायालयात जमा करण्याबाबत पुढील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय -</u>**

उपजिल्हाधिकारी, भूसंपादन क्र. ३, सोलापूर यांनी परीगणाना केल्यानुसार दिनांक ३१.०१.२०२० अखेर पर्यंतची रु. ९३,०२,०४५/- इतकी रक्कम न्यायालयात जमा करण्याबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम खालील लेखाशिर्षा मधून भागविण्यात यावी.

मागणी क्र. एच-८

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०२ - ग्रामीण आरोग्य सेवा,

१०४-सामुहिक आरोग्य केंद्र

(००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ०३९१), ५३ (मोठी बांधकामे)

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२६१६५१०६८५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.01.20 13:01:28 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा-१, मुंबई.

४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये)राज्यस्तर, मुंबई.

५. उप संचालक, आरोग्य सेवा पुणे मंडळ, पुणे.

६. जिल्हाधिकारी, सोलापूर

७. जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर

८. उपजिल्हाधिकारी, भूसंपादन क्र. ३, सोलापूर

९. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, अक्कलकोट,सोलापूर

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. सोलापूर.

११. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. निवडनस्ती (आरोग्य-३ अ).